**अॅड.श्री.राजा ठाकरे, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**
**कुरार पोलीस स्टेशन,मालाड (पु),मुंबई उपनगर येथील गु.नों.क्र.२४९/२०१८ (सचिन सावंत खुन प्रकरण) या खटल्यात मा.सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी १०१८/प्र.क्र.३५१/पोल-१०**
दुसरा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ डिसेंबर, २०१८

**संदर्भ:-** शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी २०१८/यु.ओ.आर.९४/डी-१४, दिनांक १७/११/२०१८.

**शासन निर्णय:-**

कुरार पोलीस स्टेशन,मालाड (पु),मुंबई उपनगर येथील गु.नों.क्र.२४९/२०१८ (सचिन सावंत खुन प्रकरण) या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या खटल्यात मा.सत्र न्यायालय,मुंबई येथील न्यायालयीन कामकाज पाहण्यासाठी अॅड.श्री.राजा ठाकरे यांची विधि व न्याय विभागाने उपरोक्त दि.१७/११/२०१८ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती केली आहे. सबब,प्रस्तुत प्रकरणी अॅड.श्री.राजा ठाकरे, विशेष सरकारी अभियोक्ता यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

i. परिणामकारक सुनावणी फी - ₹५०,०००/-
ii. विचारविनिमय फी (प्रतितास) - ₹१५,०००/-

२. प्रस्तुत खटल्यातील परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उप आयुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी अॅड.श्री.राजा ठाकरे,विशेष सरकारी अभियोक्ता यांना उपरोक्त फी व्यतिरिक्त अपरिणामकारक सुनावणी फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी वा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च विभागाच्या मागणी क्र.- १ बी, "२०५५-पोलीस, (००) १०८ - राज्य मुख्यालय पोलीस, (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना, (२०५५ ००९७), २८-व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३४५/१८/व्यय-७, दिनांक ०६/१२/२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१८१२२८११२९३२४९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.12.28 11:39:47 +05'30'

**( किशोर भालेराव )**

उप सचिव (विधि), गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. पोलीस आयुक्त,मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई.
६. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
८. ॲड.श्री.राजा ठाकरे,३०१,मारुती मॅन्शन,१७,रघुनाथ दादाजी स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ००१.
९. निवडनस्ती पोल १०.